**पदनिर्मीती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व आनुषंगिक आढावे आणि अतिरिक्त संवर्ग योजनांतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन....**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-७)/२००४/वित्तीय सुधारणा - १
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ सप्टेंबर २००४

**वाचा :** (१) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर २००१
(२) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक -असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-२)/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक २६ फेब्रुवारी २००२
(३) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-३)/२००१/ वित्तीय सुधारणा-१,दिनांक ९ जानेवारी २००३
(४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.८५/२००३/ वित्तीय सुधारणा-१,दिनांक २१ एप्रिल २००३
(५) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-४)/ वित्तीय सुधारणा-१,दिनांक २६ मार्च २००४
(६) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-५)/२००४/वित्तीय सुधारणा-१,दिनांक ७ जून २००४.
(७) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-६)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक १ जुलै २००४.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या महसूली जमेच्या तुलनेत आस्थापनेवरील खर्च वाढला असल्यामुळे राज्याच्या विकासाच्या / जनकल्याणाच्या योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध होऊ शकत नाही. याबाबत उपाय योजना म्हणून शासनाच्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या मासिक वेतन भत्त्यावरील प्रशासकीय स्वरुपाचा खर्च कमी करण्याच्या उद्देशाने तसेच शासकीय विभागांकडील विविध स्वरुपाच्या योजना आणि कार्यक्रम यांचे पुनरिक्षण करुन त्या योजना आणि कार्यक्रमांसाठी मंजूर करण्यात आलेल्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या पदांचा आढावा घेऊन अनावश्यक अथवा जादा ठरत असणाऱ्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांना अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यासंबंधी शासनाने निर्गमित केलेल्या उपरोक्त दि.१० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयाच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीमध्ये निदर्शनास आलेल्या प्रशासकीय आणि तांत्रिक स्वरुपाच्या अडचणी निवारण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तदनुसार शासनाने सदर शासन निर्णयात खाली दर्शविल्याप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय**

१. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या परिच्छेद-तीन मध्ये खालील प्रमाणे सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावेत.

**सुधारित उपपरिच्छेद :-**

**३.१ (अ) :** उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली नामनिर्देशनाची रिक्त पदे अथवा पुनर्जिवीत पदे तसेच नवनिर्मित पदे भरतांना ती सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी अथवा कमाल दोन वर्षाच्या कालावधीसाठी रिक्त राहीली तरी अशी पदे व्यपगत ठरणार नाहीत.

**३.१ (ब) :** ज्या शासकीय विभाग आणि कार्यालयांचा मंजूर पदांचा सर्वंकष आढावा पूर्ण होवून उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्यात येऊन तत्संबंधीचा शासन निर्णय निर्गमित झालेला आहे अशा शासकीय विभाग / कार्यालयांच्या सुधारीत आकृतिबंधाची मुदत संबंधीत विभागाच्या सुधारित आकृतिबंधाच्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन वर्षे ठेवण्यात यावी आणि त्या तीन वर्ष कालावधीत सुधारित आकृतिबंधातील कोणतीही रिक्त पदे व्यपगत ठरणार नाहीत.

२. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या परिच्छेद-४.६ ऐवजी खालील सुधारित परिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

**सुधारित परिच्छेद**

४.६ : उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली आणि पदोन्नती, बदली / प्रतिनियुक्तीने भरावयाची रिक्त / पुनर्जिवीत अथवा नविन पदे भरावयाची असल्यास सदर कार्यवाही दोन वर्षांचे आत करावी परिणामतः सदर पदे दोन वर्ष कालावधीसाठी रिक्त राहीली तरी व्यपगत ठरणार नाहीत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**विनोद कुळकर्णी**
**शासनाचे उप सचिव**

प्रति

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई.
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई.
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे / नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे/ नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन - हाऊसिंग सेल, १९-सी), मंत्रालय, मुंबई - ३२.
२८. सर्व विभागीय आयुक्त.
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक, (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१.
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, वित्तीय सुधारणा, वित्त विभाग
* पत्राद्वारे.